नाशिक जिल्ह्यातील सटाणा तालुक्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांना प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१९/प्र.क्र.१४८/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०२ मार्च, २०२०.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र./साबांप्राविना/प्रआ/दर्जोन्नत/नाशिक/४२८८, दि.०८/०१/२०१९.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र./साबांप्राविना/प्रआ/दर्जोन्नत/नाशिक/४६१, दि.०४/०२/२०२०.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नाशिक जिल्ह्यातील सटाणा तालुक्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांना प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रा.म.मा.७५२ जी पासून व्दारकाधीश साखर कारखाना ते शेवरे रा.मा.७ पर्यंतचा रस्ता. | ग्रामीण मार्ग -३६ | (०/००ते ११/००) | ११.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१६७ |
| २. | रा.मा.२० पासून अंतापुर दसवेल ते पिंपळकोठे रा.म.मा.७५२ पर्यंतचा रस्ता. | ग्रामीण मार्ग- ८३ | (०/००ते १२/००) | १२.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१६८ |
| | **एकूण** | | | **२३.०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नाशिक जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **२३.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (४१६०.१६ +२३.००) म्हणजेच **४१८३.१६ कि.मी.** इतकी तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **२३.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१०६०३.१५-२३.००) म्हणजेच **१०५८०.१५ कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००३०३१०३२३९८९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.03.03 10:35:43 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, नाशिक.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.